**सन २०१२-१३ व २०१३-१४ या वर्षातील अल्प मुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस मध्यम मुदत कर्ज आकस्मिक निधीमधून मंजूर करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एससीआर -०४१५/प्र क्र-१५०/२-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

तारीख: ७ जुलै २०१५

**वाचा :- शासन निर्णय क्र SCR ०४१५/प्रक्र १५०/ २ स दिनांक २४.६.२०१५**

**प्रस्तावना :**

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागात शेतकऱ्यांना मदत करण्यासाठी अल्पमुदत पीक कर्जाचे रूपांतरण मध्यम मुदत कर्जात केले जाते. त्यानंतर महाराष्ट्र राज्य सहकारी बँक अशा भागातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांकडून किती रकमेच्या कर्जाचे रूपांतर करावयाचे आहे याची माहिती घेऊन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचेमार्फत शासनास प्रस्ताव सादर करते. अल्पमुदतीच्या कर्जाचे रूपांतरापोटी नाबार्ड ६०% , महाराष्ट्र शासन १५ %, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक १०% व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक १५%, या प्रमाणे नाबार्डचे निकषानुसार रक्कम मंजूर करण्यात येते. अशा स्वरूपाचे रू. ४६७८.०५ लाख रकमेचे प्रस्ताव सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांचेमार्फत शासनास प्राप्त झाले आहेत. यापैकी रु. २५०० लाख एवढा निधी उपरोक्त दि. २४.६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. उर्वरित रु. १५०० लाख निधी अर्थसंकल्पीत करुन तात्काळ वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागातील शेतकऱ्यांच्या अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी नाबार्डच्या धोरणानुसार महाराष्ट्र शासनाच्या १५% हिश्श्यापोटी रु. १५०० लाख /- (रुपये पंधराशे लाख फक्त) आकस्मिकता निधीतून उपलब्ध होणा-या निधीतून वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर रक्कम रु १५०० लाख मध्यम मुदत कर्ज म्हणून अकोला जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्यादीत, अकोला या बँकेस पूढे हस्तांतरीत करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेस अदा करण्यास मंजूरी देत आहे. या कर्जाच्या अटी व शर्ती या उपरोक्त शासन निर्णय समक्रमांक दिनांक २४.६.२०१५ नुसार राहतील.

सदर आकस्मिकता निधी अग्रिम वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक आकनि २०१५/१०/ अर्थसंकल्प १३, दिनांक २ जुलै २०१५- अन्वये मंजूर करण्यात आले असून त्याचा संकगण संकेतांक क्रमांक ८००० ७०८२) असा आहे. या प्रित्यर्थचा खर्च संगणकीय अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीनुसार करण्यात यावा.

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या रु. १५०० लाख अग्रिम धनाचे संदर्भात लेखा अधिकारी, सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. आहरण व संवितरण अधिकारी यांचे लक्ष महाराष्ट्र आकस्मिकता निधी नियम क्र ६,८ आणि १२ कडे वेधण्यात येत आहे. तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांनी वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्रमांक-: सीएनएफ १०८३/१४०/अर्थसंकल्प-३, दिनांक २६.४.१९८३ आणि वित्त विभाग,शासन परिपत्रक क्रमांक १०८६/१५३/अर्थसंकल्प-३, दिनांक २८.८.१९८६ च्या परिच्छेद २(१) मध्ये दर्शविलेल्या सूचनांच्या संदर्भत खालील बाबींचे अनुपालन करावे.

अ) आकस्मिकता निधी अग्रिमातून काढण्यात येणा-या प्रत्येक रकमेच्या देयकावर वरच्या कोप-यात आकस्मिकता निधी हा शब्द लिहावा. तसेच आकस्मिकता निधी मंजूर केलेल्या वित्त विभाग, शासन ज्ञापन क्रमांक : आकनि २०१४/५/अर्थसंकल्प -१३, दिनांक २० नोव्हेंबर, २०१४ अन्वये मंजूर असे प्रत्येक देयकावर **“लाल शाईने”** लिहावे.

ब) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या रु. १५०० लाख इतका अग्रिम धन दिनांक १३ जुलै,२०१५ पर्यंत पूर्णत: खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

क) आकस्मिकता निधीतून मंजूर केलेल्या खर्चाचा हिशोब वेगळा ठेवून त्यासंबंधीचा मासिक खर्चाचा प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास (सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभाग) तसेच महालेखापाल यांना सादर करावा.

ड) देयकासमवेत जोडण्यात येणा-या संगणक स्लिपमध्ये मुख्य लेखाशिर्ष /गौण शिर्ष / संकेतांक इत्यादि उल्लेख करावा.

४. राज्यात टंचाई परिस्थिती जाहीर झालेल्या भागात शेतकऱ्यांच्या अल्पमुदत कर्जाचे मध्यम मुदत कर्जात रुपांतरण करण्यासाठी नाबार्डच्या धोरणानुसार महाराष्ट्र शासनाचा १५% हिश्श्याचा निधी मंजूर करण्यात आलेल्या रु १५०० .लाख(रुपये पंधराशे लाख फक्त ) ,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,मागणी , क्रमांकमागणी क्र.व्ही ५, ६४२५ सहकारासाठी कर्जे, (००)(१०७) सहकारी पतसंस्थांना कर्जे, (००) (०३) अल्पमुदतीच्या कर्जाचे मध्यम मुदतीच्या कर्जात रूपांतर करण्यासाठी सहकारी पतसंस्थांना कर्जे (६४२५ ००३७) या लेखाशिर्षाखाली भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनुमतीने वित्त विभाग, ज्ञापन क्रमांक : आकनि २०१५/१०/ अर्थसंकल्प १३, दिनांक २ जुलै २०१५- अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनयच्या www.maharashtra.gov.in या सकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५०७०७१७२८४११२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Santosh Arun Patil

Digitally signed by Santosh Arun Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Officer On Special Duty, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=e52439642ab57c332b2a3e3e46f0d907ba6167409ef6d52c943bf775ecf042fd, cn=Santosh Arun Patil
Date: 2015.07.08 15:24:44 +05'30'

**(संतोष पाटील)**
विशेष कार्य अधिकारी,

**प्रत,**

१. सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रधान सचिव (मतदकार्य व पूनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय.

३. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई (३ प्रती)
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरीक्षण) महाराष्ट्र राज्य- नागपूर (३ प्रती)
५. महाव्यवस्थापक, NABARD, प्लॉट नं. सी-२४/जी, बांद्रा-कुर्ला संकुल, पोस्ट बँग नं. ८१२१, बांद्रा पूर्व, मुंबई ४०००५१
६. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बॅक मर्या, मुंबई.
७. सहसंचालक , लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन ५ वा मजला,मंत्रालया समोर
८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई /पुणे (३ प्रती)
९. निवासी लेखापरिक्षाधिकारी, मुंबई. / पुणे
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे. (३ प्रती)
११. नियोजन विभाग (१४३१) मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग (व्यय-२, व्यय-१४, अर्थ-१३)
१३ कक्ष अधिकारी (१६-स, व १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई-३२
१४ निवड नस्ती (२-स)